**प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील असलेल्या कार्यालयातील अस्थायी पदे स्थायी करणे, तसेच अस्थायी पदांना मुदतवाढ देणे...**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र. १२ /२००४/वित्तीय सुधारणा-१,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : १९ ऑगस्ट, २००४**

**संदर्भ : शासन निर्णय, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.२००१**

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.९.२००१ च्या शासन निर्णयातील आदेशांनुसार शासनाचे सर्व प्रशासकीय विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील विभागप्रमुख यांनी त्यांच्या आस्थापनेवरील सर्व मंजूर पदांचा आढावा घेवून तत्संबंधीच्या सुधारित आकृतिबंधाच्या अहवालास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक ठरविण्यात आले आहे. तद्नुसार उच्चस्तरीय सचिव समितीकडून पदविषयक आढावा नियमित स्वरुपात घेण्यात येत आहे. प्रत्येक प्रशासकीय विभाग / कार्यालये यांच्या आस्थापनेवरील मंजूर करण्यात आलेल्या अस्थायी पदांपैकी ८० टक्के अस्थायी पदांचे शासनाच्या मान्यतेने स्थायी स्वरुपात रुपांतरण करुन घेणे आवश्यक आहे. तथापि या संदर्भात स्थायीकरणाबाबतची कार्यवाही सध्या केली जात नसल्याचे प्रधान सचिव (वित्त) यांनी दिनांक १७.७.२००४ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत समितीच्या निदर्शनास आणले. त्याचप्रमाणे सचिव (व्यय) यांनी समितीच्या असे निदर्शनास आणले की, सध्या शासकीय विभाग / कार्यालयातील अस्थायी पदांना वेळोवेळी मुदतवाढ देणे आवश्यक असल्यामुळे तत्संबंधीच्या शेकडो नस्ती वित्त विभागामध्ये सहमतीसाठी प्राप्त होतात. प्रत्यक्षात अस्थायी पदे आणि स्थायी पदे यामध्ये सेवासुविधांविषयक कोणताही मूलभूत फरक सध्या राहिलेला नसल्यामुळे वित्त विभागाकडील कामाचा कार्यभार कमी करण्याच्या दृष्टीने संबंधीत प्रशासकीय विभागांनीच त्यांच्या आस्थापनांवरील / त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील शासकीय विभाग / कार्यालयातील आस्थापनांवरील मंजूरी असलेल्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांच्या स्तरावरच प्रदान करणे आवश्यक आहे. या सर्व बाबींची उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत चर्चा होवून सदर समितीने केलेल्या शिफारशींनुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

ज्या शासकीय विभाग/कार्यालयांचे पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय सचिव समितीने अंतिमतः मान्य केलेले नाहीत अशा सर्व शासकीय विभाग/कार्यालयांच्या आस्थापनांवरील मंजूर पदांपैकी अस्तित्वात असलेल्या सर्व

continuation

पदांना कमाल दिनांक २८ फेब्रुवारी, २००६ पर्यंतच्या कालावधीसाठी आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्याचे अधिकार या शासन निर्णयानुसार सर्व मंत्रालय प्रशासकीय विभागांना देण्यांत येत आहेत. तद्नुसार सर्व मंत्रालय प्रशासकीय विभागांनी अस्थायी पदांना आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्याची पुढील कार्यवाही त्यांचे स्तरावर पूर्ण करावी. तथापि दिनांक २८ फेब्रुवारी, २००६ पर्यंतच्या कमाल कालावधीमध्ये त्यांच्या शासकीय विभागांचा / कार्यालयांचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमतः मान्य करुन घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**विनोद कुळकर्णी**

**शासनाचे उप सचिव.**

१. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
२. सर्व सह / उप सचिव (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. उप सचिव (आस्थापना), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४. उप सचिव (विक्रीकर प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. उप सचिव (कोषागार प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. सर्व अवर सचिव (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. सर्व कक्ष अधिकारी (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. कार्यासन अधिकारी (प्रशा-१), हमी , अल्पबचत व लॉटरी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. कार्यासन अधिकारी (विक्रीकर प्रशासन - १,२,३ व ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. कार्यासन अधिकारी (कोषागार प्रशासन - १,२,३,४ व ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११. कार्यासन अधिकारी (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.